**राज्यातील न्यायालयांमध्ये प्रलंबित असलेली प्रकरणे लवकरात लवकर निकाली काढण्यासाठी १०० जलदगती न्यायालये पुढे सुरु ठेवण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन,**
विधी व न्याय विभाग,
शासन निर्णय क्रमांक : एफटीसी २०१०/प्र.क्र.८३/ नऊ
मंत्रालय, मुंबई -४०० ०३२, दिनांक २३ मार्च, २०११.

**प्रस्तावना :** ११ व्या केंद्रीय वित्त आयोगाच्या शिफारशीनुसार केंद्र शासन पुरस्कृत योजने अंतर्गत राज्यातील न्यायालयांमध्ये प्रलंबित असलेली प्रकरणे लवकरात लवकर निकाली काढण्यासाठी राज्यामध्ये एप्रिल २००१ पासुन एकुण १८७ जलदगती न्यायालये स्थापन करण्यात आली आहेत. आता केंद्र शासनाने सदर योजनेस दिनांक ३१.३.२०११ पर्यंत मुदतवाढ दिली असुन स्पष्ट केले आहे की, दिनांक ३१.३.२०११ नंतर जलदगती न्यायालयासाठी केंद्र शासन अनुदान उपलब्ध करुन देणार नाही. सबब उच्च न्यायालय, मुंबई यांनी दिनांक ३१.३.२०११ नंतर पुढील ५ वर्षासाठी १०० जलदगती न्यायालये चालु ठेवण्याचे व त्यासाठीच्या आवर्ती / अनावर्ती खर्चासाठी राज्य शासनाने अनुदान उपलब्ध करुन देण्याचे प्रस्ताविले आहे. त्यानुसार दिनांक ३१.३.२०११ नंतर पुढील ५ वर्षासाठी १०० जलदगती न्यायालये सुरु ठेवण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :** राज्यातील न्यायालयांमध्ये प्रलंबित असलेली प्रकरणे लवकरात लवकर निकाली काढण्यासाठी दिनांक ३१.३.२०११ नंतर पुढील ५ वर्षासाठी १८७ जलदगती न्यायालयांपैकी १०० जलदगती न्यायालये सुरु ठेवण्यास व त्यासाठी खालील दर्शविलेली तदर्थ जिल्हा न्यायाधीश व त्यांच्या सहाय्यभुत कर्मचारी वर्गासह एकुण ५०० पदे पुढे सुरु ठेवण्यास मंत्रिमंडळाने दिनांक १५.३.२०११ रोजी झालेल्या बैठकीमध्ये मान्यता दिली आहे. त्यानुसार सदर आस्थापनेवर खालील आस्थाई पदे दिनांक ३१ मार्च, २०११ पासुन दिनांक २९ फेब्रुवारी, २०१२ पर्यंत चालू ठेवण्यास शासन याद्वारे मंजुरी देत आहे. सदर आस्थाई पदांना दिनांक २९ फेब्रुवारी, २०१२ नंतर पुढील मुदतवाढ घेणे आवश्यक राहील.

| अ.क्र | पदनाम | वेतनश्रेणी | पदांची संख्या |
|---|---|---|---|
| १ | तदर्थ जिल्हा न्यायाधीश | ५१५५०-१२३०-५८९३०-१३८०-६३०७० | १०० |
| २ | लघुलेखक(उच्च श्रेणी) | ९३००-३४८०० + ग्रेड वेतन ४४०० | १०० |
| ३ | पेशकार (वरीष्ठ लिपिक) | ५२००-२०२०० + ग्रेड वेतन २४०० | १०० |
| ४ | कनिष्ठ लिपिक | ५२००-२०२०० + ग्रेड वेतन १९०० | १०० |
| ५ | शिपाई | ४४४०-७४४० + ग्रेड वेतन १३०० | १०० |
| | एकूण | | ५०० |

५. या प्रस्तावाअंतर्गत येणारा खर्च "२०१४, न्यायदान- (भारित) १०२- उच्च न्यायालये, १०२ (०९) (०१) जलदगती न्यायालयांसाठी केंद्र पुरस्कृत विशेष अनुदान क्र.२०१४ ०३८ ८" या शिर्षाखाली सन २०११-२०१२ या वित्तीय वर्षासाठी मंजूर होणाऱ्या अनुदानातून भागविण्यात यावा.

कृ.मा.प

६.    **ज्या जिल्हयांच्या ठिकाणी मागासवर्गीयांवरील अत्याचाराची प्रकरणे, महिलांवरील अत्याचाराची / बलात्काराची प्रकरणे, भ्रष्टाचाराची प्रकरणे, मोटार अपघात दाव्यांच्या भरपाईची प्रकरणे, न्यायालयीन बंदीची प्रकरणे व भुसंपादनाची प्रकरणे यासारखी गंभीर स्वरुपाची प्रकरणे जास्त प्रमाणात प्रलंबित आहेत अशी प्रकरणे प्राथम्याने व जलदगतीने चालविण्यासाठी जलदगती न्यायालयाकडे वर्ग करण्यात यावीत.**

प्रामुख्याने मुंबई, ठाणे, पुणे, नाशिक, नागपूर, सोलापूर व अहमदनगर या जिल्हयांच्या ठिकाणी प्रलंबित प्रकरणांची संख्या अधिक असल्याने त्या ठिकाणी जादा जलदगती न्यायालये स्थापन करुन तेथील प्रलंबित प्रकरणे जलदगती न्यायालयाकडे वर्ग करण्यात यावीत.

७.    सदर जलदगती न्यायालयांमध्ये वर्ग / दाखल होणा-या, निकाली काढण्यात येणा-या व प्रलंबित राहणा-या प्रकरणांचा प्रत्येक न्यायालयनिहाय मासीक अहवाल उच्च न्यायालय, मुंबई यांनी संबंधीतांकडुन प्राप्त करुन घ्यावा व त्याचा आढावा घेऊन एकत्रित मासिक अहवाल शासनास सादर करावा.

८.    हा शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने व त्या विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक २१८/११/ व्यय-६, दिनांक २२.३.२०११ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशांनुसार व नावाने,**

**(विजय ल.आचलिया)**
**प्रधान सचिव व विधी परामर्शी**

**प्रत :-**

महाप्रबंधक, उच्च न्यायालय, मुंबई,
महालेखापाल -एक (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई,
महालेखापाल -दोन (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, नागपूर,
सर्व जिल्हा व सत्र न्यायाधीश,
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
वित्त विभाग/ व्यय-६/वित्तीय सुधारणा,
विधी व न्याय विभाग कार्यासन-२३,२४ व २५,
निवड नस्ती.